**मागणी क्र.झेडजी-०३, प्रधानशीर्ष २२२५ अंतर्गत "विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती" नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्र. शिवृत्ती-२०१८/प्र.क्र.११८(भाग-१)/शिक्षण**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २३ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ११-६-२००३ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जातीच्या मुलामुींना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्याबाबत योजना राबविण्यात येत आहे. सदर योजना विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी नसल्यामुळे सदर प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परदेशातील नामांकित शिक्षण विद्यापीठामधील उच्च शिक्षणापासून वंचित रहावे लागत आहे. सदर बाब विचारात घेऊन, खुल्या प्रवर्गासह, विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजना राबविण्याबाबतचा निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २१/८/२०१८ रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला आहे.

उच्च व तंत्र शिक्षण विभागाने प्रस्तावित केलेल्या योजनेच्या व्याप्तीमध्ये किंचीतसा बदल करून गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणे या नावाने शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सदर योजना सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर योजनेस नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत महालेखापाल कार्यालयाने तसेच वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती" मागणी क्र.झेडजी-०३, प्रधानशीर्ष २२२५ अंतर्गत नवीन उपशीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे. नवीन लेखाशीर्षाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| "मागणी क्र.झेडजी-०३,<br>प्रधानशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण,<br>०३, मागासवर्गीयांचे कल्याण<br>२७७- शिक्षण<br>०२- शिष्यवृत्ती विद्यावेतन<br>(०२)(१८) "विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती"<br>( २२२५ एफ २१८ ) (कार्यक्रम) | Demand No.ZG-०३.<br>२२२५, WELFARE OF SCHEDULED CASTES, SCHEDULED TRIBES, OTHER BACKWARD CLASSES AND MINORITIES<br>(०३) WELFARE OF BACKWARD CLASSES<br>२७७- Education<br>०२-Scholarship Sripends<br>(०२)(१८) Scholarship for higher Foreign Education to Meritorious Students of VJNT, OBC & SBC<br>२२२५ F २१८) (Scheme) |

२. हे आदेश महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी) १, महाराष्ट्र, मुंबई यांच्याशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ख.वि/चा-१/ विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग/युओआर-१०२/२०१८-१९/९२५, दि.१२.१२.२०१८ तसेच, वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.७७/ अर्थ.५, दि.२१.१२.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१२५११५५०९५६२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shri Ravindra Gurav
Date: 2019.01.25 12:03:54 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (TM Section) महाराष्ट्र, मुंबई
३) कार्यासन व्यय-१४ / अर्थसंकल्प-५, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
४) कार्यासन-१४१३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
५) निवड नस्ती.